रेशीम संचालनालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे सुरू ठेवण्यास मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्र. सपववि-४००३१/१/२०२३-DESKSERICULTURE-CMTD**

**मंत्रालय, मुंबई-४०००३२**

**दिनांक:- १३ मार्च, २०२५**

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, सपववि-४००३१/१/२०२३-DESKSERICULTURE-CMTD, दि.२३.०९.२०२४.

२) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र. रे/ कार्या-१/ आस्था-३/ अ.प.मु.वाढ/ ११३, दिनांक २४.०१.२०२५.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

रेशीम संचालनालय व संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांमधील एकुण ६३ अस्थायी पदे दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत पुढे सुरू ठेवण्यास संदर्भाधीन दि.२३.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ शासन निर्णयामधील तरतूदीनुसार सर्व प्रशासकीय विभागांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या सहा महिन्यांच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. संचालक (रेशीम) यांनी दि.२४.०१.२०२५ रोजीच्या पत्रान्वये रेशीम संचालनालयातील अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे सुरू ठेवण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने रेशीम संचालनालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रेशीम संचालनालय व संचालनालयाच्या आस्थापनेवरील सोबतच्या प्रपत्र “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण ६३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत पुढे सुरू ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण केली आहेत, त्याच प्रयोजनासाठी चालू ठेवण्यात यावी.

३. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च हा पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| मागणी क्रमांक | : | व्ही-२ |
| मुख्य लेखाशीर्ष | : | २४२५ सहकार |
| गौण शीर्ष | : | ००१(०१)(१३) रेशीम संचालनालय<br>(२४२५ १३४१) (अनिवार्य) |

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१३१६०१२९२५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ALKA VISHRAMRAO JAGTAP

Digitally signed by ALKA VISHRAMRAO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA VISHRAMRAO JAGTAP
Date: 2025.03.13 16:02:35 +05'30'

**सहपत्र :- प्रपत्र "अ"**

**( अलका जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव.
२) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, प्रशासकीय इमारत क्र.२, ६ वा माळा,बी विंग, आयुक्त कार्यालय परिसर, सिव्हील लाईन्स,नागपूर-४४०००१
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे.
५) अवर सचिव (१७-स ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी, (व्यय २/ अर्थसंकल्प-१३/ आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
७) उपसंचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, छत्रपती संभाजीनगर.
८) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, नागपूर/अमरावती/पुणे.
९) सर्व रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-१/२.
१०) निवड नस्ती.

## प्रपत्र "अ"

(शासन निर्णय सपववि-४००३१/१/२०२३-DESKSERICULTURE-CMTD ,
दिनांक १३,मार्च, २०२५ सोबतचे सहपत्र)

| अ.क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | |
| १. | उपसंचालक | एस- २१ : ५७१००-१८०८०० | १ |
| २. | सहायक संचालक | एस- १७ : ४७६००-१५११०० | २ |
| ३. | रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१ | एस-१६ : ४४९००-१४२४०० | २ |
| ४. | रेशीम विकास अधिकारी श्रेणी-२ | एस-१५ : ४१८००-१३२३०० | ४ |
| ५. | वरीष्ठ तांत्रिक सहायक | एस-११: ३०१००-९५१०० | ११ |
| ६. | वरीष्ठ क्षेत्र नि- प्रयोगशाळा सहायक | एस-९ : २६४००-८३६०० | ६ |
| ७. | प्रयोग निर्देशक | एस-८ : २५५००-८११०० | ३ |
| ८. | क्षेत्र सहायक | एस-७ : २१७००-६९१०० | २३ |
| ९. | रेअरिंग ऑपरेटिव्ह | एस-५ : १८०००-५६९०० | १ |
| १०. | रेअरर्स/प्रयोगशाळा परिचर | एस-१ : १५०००-४७६०० | २ |
| | **अतांत्रिक पदे** | | |
| ११. | वरीष्ठ अधिक्षक | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ |
| १२. | अधिक्षक (लेखा व आस्था) | एस-१३ : ३५४००-११२४०० | १ |
| १३. | वरीष्ठ सहायक | एस-८ : २५५००-८११०० | ३ |
| १४. | लिपीक तथा टंकलेखक | एस-६ : १९९००-६३२०० | ३ |
| **एकूण पदे** | | | **६३** |

ALKA VISHRAMRAO JAGTAP

Digitally signed by ALKA VISHRAMRAO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA VISHRAMRAO JAGTAP
Date: 2025.03.13 16:03:16 +05'30'

( अलका जगताप )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन